**जगत जागृती शिक्षण प्रसारक मंडळ, चाकूर, जि.लातूर संचलित जगत जागृती प्राथमिक विद्यामंदिर, चाकूर, जि.लातूर शाळेचे नवीन बस स्थानकाशेजारी, चाकूर, जि.लातूर येथे स्थलांतराबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्राशास्थ ३२१९/प्र.क्र.४७३/एसएम-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०६ मार्च, २०२०

वाचा :

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक : माशास्थ २०१२/(५९/१२) माशि-२, दिनांक ३१ जुलै, २०१३.**

संदर्भ :

**विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर विभाग, लातूर यांचे क्र.शिउसंला/प्रावि-२/एसव्हीएम/१००३/२०१८-१९, दिनांक १ मार्च, २०१९ चे पत्र**

**प्रस्तावना :-**

जगत जागृती शिक्षण प्रसारक मंडळ, चाकूर, जि.लातूर संचलित जगत जागृती प्राथमिक विद्यामंदिर, चाकूर, जि.लातूर या मराठी माध्यमाच्या अनुदानित प्राथमिक शाळेचे, नवीन बस स्थानकाशेजारी, जगत जागृती संकुल, इमारत क्र.२, चाकूर, ता.चाकूर, जि.लातूर येथे स्थलांतर करण्याचा संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त झालेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त शाळेचे सध्याच्या अपुऱ्या इमारतीतून स्वयंपूर्ण इमारतीमध्ये स्थलांतर प्रस्तावित केले आहे. सदर शाळेचे वर नमूद ठिकाणी स्थलांतर करण्यास खालील अटी व शर्तीवर मान्यता देण्यात येत आहे. :-

(१) स्थलांतरीत शाळेची किमान पटसंख्येची अट कोणत्याही कारणास्तव शिथिल केली जाणार नाही. तसेच सर्व विद्यार्थ्यांना स्थलांतराच्या ठिकाणी सामावून घेणे आवश्यक राहील.

(२) शासनाकडून शाळा, शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी, वेतन/वेतनेतर अनुदान, विद्यार्थी इ.संदर्भात वेळोवेळी विहित करण्यात येणारे अधिनियम, नियम, आदेश इ.चे पालन संस्थेने करणे आवश्यक राहील.

(३) शाळेच्या बाबतीत मुळ शासन परवानगीच्या व मान्यतेच्या कोणत्याही अटी व शर्तीमध्ये बदल होणार नाहीत.

(४) सदर शाळा मुळ ठिकाणी अनुदानाच्या ज्या तत्वावर कार्यरत होती, त्याच तत्वावर स्थलांतरीत ठिकाणी कार्यरत राहील.

(५) सदरहू स्थलांतरासंदर्भात शासनाकडे अथवा शिक्षण विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडे कोणत्याही प्रकारच्या तक्रारी वा आक्षेप आल्यास किंवा स्थलांतरासंदर्भातील अटींचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास स्थलांतर रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

२. विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर विभाग, लातूर यांनी सदर शाळेच्या स्थलांतराबाबत पुढील कार्यवाही ४ आठवडयात करावी व केलेल्या कार्यवाहीबाबत शासनास अवगत करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३०६१५०४४६८१२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pravin Rajaram Mundhe

Digitally signed by Pravin Rajaram Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ad4976f306de2810214ec2ea330d9daea59f1d3f45fae9227a3feaa541af10d1, serialNumber=dc78036626ec580d66c0ac502d43af5f670b5ba13f51213ad071acd53714a284, cn=Pravin Rajaram Mundhe
Date: 2020.03.06 15:06:54 +05'30'

**( प्रविण मुंढे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर विभाग, लातूर
३. शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद, लातूर
४. अध्यक्ष/ सचिव, जगत जागृती शिक्षण प्रसारक मंडळ, चाकूर, जि.लातूर
५. निवडनस्ती ( एसएम-१).